**महाराष्ट्र शासनाचे सर्व विभाग, शासकीय संस्था व शासन अंगीकृत महामंडळे यांना जीवनावश्यक वस्तु, स्टेशनरी कापड व अन्नपदार्थ इत्यादी वस्तुंची खरेदी करण्याकरीता दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई यांना प्राधान्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक सपस १०१० / प्र. क्र.१६/ २४ स,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : ३० ऑगस्ट, २०१०

**वाचा :-** **१.** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सपस १००६/ प्र.क्र. ३३७/ २४ स, दिनांक १९ जानेवारी, २००७.

**२.** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सपस १००६/ प्र.क्र.३३७ /२४ स, दिनांक २३ मे, २००७.

**३.** उद्योग,उर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखसं १०८८ / (२५१२)/उद्योग-६, दिनांक २ जानेवारी, १९९२

**४.** उद्योग,उर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखसं १०९३/(२६३५)/उद्योग-६, दिनांक १६ जुलै, १९९३

**प्रस्तावना :-**

दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई या संस्थेला महाराष्ट्र शासनाचे सर्व विभाग, शासकीय संस्था व शासन अंगीकृत महामंडळे यांना जीवनावश्यक वस्तु, स्टेशनरी कापड व अन्नपदार्थ इत्यादी वस्तुंची खरेदी करण्याकरीता दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई यांना प्राधान्य देण्याबाबत उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक १ नुसार शासन निर्णय निर्गमीत करण्यात आला आहे. या शासन निर्णयामध्ये ग्राहक महासंघाने सुचविल्यानुसार उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक २ नुसार दुरुस्ती करण्यात आली आहे. आता या शासन निर्णयामध्ये ग्राहक महासंघाने त्यांच्या दिनांक २६.३.२०१० च्या पत्रान्वये करण्यात आलेल्या विनंतीनुसार शासन निर्णयामध्ये दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

राज्यातील सर्व शासकीय / निमशासकीय कार्यालये, शासकीय महामंडळे इत्यादी संस्थांना त्यांच्या दैनंदिन कामकाजाकरीता आवश्यक असणा-या जीवनावश्यक वस्तु, कापड, अन्नधान्य, कार्यालयीन स्टेशनरी, उपकरणे, शालेय साहित्य, मोडयुलर फर्निचर व कृषि प्रक्रिया उद्योगाकरीता लागणारी यंत्रसामुग्री (आंतरराष्ट्रीय/ राष्ट्रीय मानांकित उदा. आय.एस.ओ. / बी.आय.एस./ सी.एफ.टी.आर.आय. इत्यादी ) तसेच इतर नित्योपयोगी वस्तु या वस्तुंची खरेदी "दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई " यांच्याकडून प्राधान्याने करण्यात यावी.

एखादया वस्तुंचा पुरवठा करताना खाजगी व्यापारी व महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई यांचे दरपत्रक/निविदा जर समान रक्कमेच्या आल्यास महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशन लि., मुंबई यांना प्राधान्य देऊन त्यांना साहित्य पुरवठयाचे काम देण्यात यावे. एकावेळी रुपये १०००/- पेक्षा कमी किंमतीची एकुण खरेदी असल्यास,सक्षम अधिका-याच्या मते महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील तरतुदींचे पालन करणे ज्यावेळी शक्य नसेल त्यावेळी कमीत कमी तीन दरपत्रके मागविण्याची गरज नाही. अशी खरेदी शक्यतो मान्यताप्राप्त सहकारी ग्राहक भांडारातुन करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. **२०१००८३०१५३०४५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( आ. अ. माळी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सहकार व पणन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
मा. राज्यमंत्री (सहकार व पणन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
साखर आयुक्त व अतिरिक्त निबंधक, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
सर्व विभागीय आयुक्त ( महसूली विभाग)
सर्व जिल्हाधिकारी
कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त,पशुवैद्यकीय संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व आयुक्त, महानगर पालिका
सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, मार्केटयार्ड, गुलटेकडी, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या.कन्मूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रिट, मसजीद, मुंबई - ९.
कार्यकारी संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को ऑपरेटिव्ह कंझ्युमर्स फेडरेशल लि., ८७-ए, राज चेंबर्स, देवजी रतनशी मार्ग, दाणाबंदर, मुंबई-९
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ,मुंबई
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
संचालक, सर्व शिक्षा अभियान, चर्नी रोड, मुंबई.
सर्व मुख्य अधिकारी, नगर पालिका
सर्वविभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
सर्वजिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
सर्व कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती, २४ स सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

------------------------------